मराठवाडा मुक्ती संग्राम - अमृत महोत्सवाच्या पार्श्वभूमीवर भारतरत्न डॉ.बाबासाहेब आंबेडकर आदर्श शाळा योजनेकरीता निधी वितरीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः आदर्श २०२३/प्र.क्र.१०३/एसडी-६**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२

दिनांक:- ३१ मार्च, २०२५

**वाचा:-**

१. शालेय शिक्षण व क्रिडा विभाग समक्रमांक शासन निर्णय दि.१४.१०.२०२४
२. राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई यांचे पत्र क्र.मप्राशिप/सशि/बांधकाम/आदर्श शाळा-११५६/२०२४-२५/३४९८, दि.१४.०१.२०२५
३. शालेय शिक्षण व क्रिडा विभाग समक्रमांक शासन निर्णय दि.१३.०३.२०२५
४. वित्त विभाग परिपत्रक क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि.१७.०३.२०२५
५. शालेय शिक्षण व क्रिडा विभाग समक्रमांक शासन निर्णय दि.२९.०३.२०२५
६. शालेय शिक्षण व क्रिडा विभाग शासन निर्णय क्र.पुनर्वि-२०२५/प्र.क्र.३९/अर्थसंकल्प, दि.३१.०३.२०२५

**प्रस्तावना:-**

संदर्भ क्र.०१ च्या शासन निर्णयानुसार मराठवाडा मुक्तिसंग्राम अमृत महोत्सवाच्या पार्श्वभूमीवर दि.१६.०९.२०२३ रोजी छत्रपती संभाजीनगर येथे संपन्न झालेल्या मा.मंत्रिमंडळ बैठकीच्यावेळी घोषणा करण्यात आल्यानूसार खालील प्रस्तावांना शासनाची मान्यता प्रदान करण्यात आली आहे.

i. मराठवाडा मुक्ती संग्रामात अतूलनीय कामगीरी बजावणाऱ्या व मराठवाड्याची राणी लक्ष्मीबाई असा लौकीक प्राप्त असलेल्या वीरांगना स्व. श्रीम. दगडाबाई शेळके यांचे यथोचित स्मारक त्यांच्या मूळ गावी म्हणजे मौजे धोपटेश्वर, ता. बदनापूर, जि. जालना येथील जिल्हा परिषदेच्या शाळेच्या प्रांगणात उभारण्यास सदर शाळेचा समावेश भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर आदर्श शाळा योजनेत करुन विविध विकास कामांसाठी रु. ५ कोटी (अक्षरी रु.पाच कोटी) इतका निधी उपलब्ध करुन देणे. तथापि या संदर्भात करावयाच्या नेमक्या कार्यवाहीचे स्वतंत्र आदेश सामान्य प्रशासन विभागाच्या अभिप्रायानूसार यथावकाश निर्गमित करण्यात येतील.

ii. शासनाच्या अभिलेखात ज्यांची मराठवाडा मुक्ती संग्रामातील स्वातंत्र्य सेनानी म्हणून नोंद आहे, त्यांच्या मूळ गावातील स्थानिक स्वराज्य संस्थेची शाळा भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर आदर्श शाळा योजनेत समाविष्ट करण्यास व यानुषंगाने मराठवाड्यातील ७६ तालुक्यातून विहीत निकषांची पूर्तता करणाऱ्या प्रत्येकी एक शाळेची निवड करुन प्रत्येक शाळेस रु.१.२५ कोटी (अक्षरी रु.एक कोटी पंचवीस लाख) व एकूण रु.९५.०० कोटी (अक्षरी रु. पंच्याण्णव कोटी इतका निधी विविध सुविधांचे निर्माण व संसाधनांची उपलब्धता सुनिश्चित करण्यासाठी उपलब्ध करुन देणे.

iii. भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर आदर्श शाळा योजनेतील मूळ १५०० शाळांमध्ये या योजनेतील ७६ शाळांचा समावेश असणार नाही. या ७६ शाळा भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर आदर्श शाळा योजनेत अतिरीक्त शाळा म्हणून समाविष्ट असतील.

मराठवाडा मुक्ती संग्राम - अमृत महोत्सवाच्या पार्श्वभूमीवर भारतरत्न डॉ.बाबासाहेब आंबेडकर आदर्श शाळा योजनेकरीता संदर्भ क्र.२ अन्वये नोंदविलेल्या मागणीच्या अनुषंगाने अर्थसंकल्पीय तरतुदीपैकी संदर्भ क्र.३ येथील शासन निर्णयान्वये रु.३८.९८८० कोटी इतका निधी वितरीत करण्यात आला आहे. तसेच संदर्भ क्र.५ येथील शासन निर्णयान्वये रु.४५.५१२० कोटी इतका निधी वितरीत करण्यात आला आहे. असा एकूण रु. ८४.५० कोटी इतका निधी वितरीत करण्यात आला. अन्य लेखाशिर्षामधून वित्त विभागाकडून पुनर्विनियोजनाद्वारे उपलब्ध झालेला उर्वरित रु.१०,५०,००,०००/- (अक्षरी रुपये दहा कोटी पन्नास लक्ष फक्त) इतका निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय:-**

ई-४, ४२०२, २०२ (माध्यमिक शिक्षक) (००), (००), (०४) शिक्षण उपसंचालक व शिक्षण विभागाच्या कार्यालय इमारतीचे बांधकाम (कार्यक्रम) (४२०२ ६२२८), ५३-मोठी बांधकामे या लेखाशिर्षामधून पुनर्विनियोजनाद्वारे उपलब्ध झालेला उर्वरित रु.१०,५०,००,०००/-(अक्षरी रुपये दहा कोटी पन्नास लक्ष फक्त) इतका निधी खाली दर्शविल्याप्रमाणे वितरीत करण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

(हजारात)

| अ. क्र. | लेखाशिर्ष | उप शिर्ष | सन २०२४-२५ चे सुधारित अंदाज | आतापर्यंत झालेला खर्च | पुनर्विनियोजनासाठी प्रस्तावित रक्कम | | पुनर्विनियोजन नंतर होणारी रक्कम |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | | घट | वाढ | |
| १. | ई-४ शिक्षण उपसंचालक व शिक्षण विभागाच्या कार्यालय इमारतीचे बांधकाम (कार्यक्रम) ५३, मोठी बांधकामे (४२०२ ६२२८) | ५३ | ३१५००० | १००००० | १०५००० | ----- | २००००० |
| २. | मागणी क्र.ई - ०४, ४२०२, सर्वसाधारण शिक्षण, ०१, प्राथमिक शिक्षण, २०१, (००) (०३), राज्यात आदर्श शाळा विकसित करणे (कार्यक्रम) (४२०२ ६४९८) | ५२ | १ | ३३२४६० | ----- | ९५००० | ९५००१ |

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| ३. | लेखाशीर्ष मागणी क्र.ई - ०४, ४२०२, सर्वसाधारण शिक्षण, ०१, माध्यमिक शिक्षण, २०२, (००) (०९), राज्यात आदर्श शाळा विकसित करणे (कार्यक्रम) (४२०२ ६५०४) | ५२ | १ | १२२६६० | ----- | १०००० | १०००१ |
| | | | | एकूण | १०५०० | १०५०० | |

२. **प्राथमिक शिक्षणाच्या अनुषंगाने राज्यात आदर्श शाळा विकसित करणे (कार्यक्रम) (४२०२ ६४९८)** या योजनेंतर्गत ५२-यंत्र सामग्री व साधन सामग्री या उदीष्टाखाली पुनर्विनियोजनाद्वारे रु.९५०.०० लक्ष इतका निधी तसेच **माध्यमिक शिक्षणाच्या अनुषंगाने राज्यात आदर्श शाळा विकसित करणे (कार्यक्रम) (४२०२ ६५०४)** या योजनेंतर्गत ५२-यंत्र सामग्री व साधन सामग्री या उदीष्टाखाली पुर्नविनोजनाद्वारे रु.१००.०० लक्ष असा एकूण रु.१०५०.०० लक्ष इतका निधी वितरीत करण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

३. या संदर्भात होणारा खर्च रु. ९५०.००लक्ष (अक्षरी रुपये नऊ कोटी पन्नास लक्ष फक्त ) हा **"मागणी क्र. ई-०४, ४२०२, सर्वसाधारण शिक्षण, ०१, प्राथमिक शिक्षण, २०१, (००) (०३) राज्यात आदर्श शाळा विकसित करणे (कार्यक्रम) (४२०२ ६४९८) ५२-यंत्र सामग्री व साधन सामग्री "** या लेखाशिर्षाखालील सन २०२४-२५ च्या मंजूर तरतूदीमधून भागविण्यात यावा. तसेच रु.१००.००लक्ष (अक्षरी रुपये एक कोटी फक्त) हा खर्च **"मागणी क्र. ई-०४, ४२०२, सर्वसाधारण शिक्षण, ०१, माध्यमिक शिक्षण, २०२, (००) (०९) राज्यात आदर्श शाळा विकसित करणे (कार्यक्रम) (४२०२ ६५०४) ५२-यंत्र सामग्री व साधन सामग्री "** या लेखाशिर्षाखालील सन २०२४-२५ च्या मंजूर तरतूदीमधून भागविण्यात यावा.

४. निधी ज्या प्रयोजनासाठी मंजूर करण्यात आले आहे, त्याच प्रयोजनासाठी खर्च करण्यात यावा. यासाठी शालेय शिक्षण व क्रिडा विभाग, मंत्रालय, मुंबई येथील सह/उप सचिव व अवर सचिव / कक्ष अधिकारी यांना अनुक्रमे नियंत्रक अधिकारी व आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५. आहरण व संवितरण अधिकारी यांनी कोषागारातून उपरोक्त निधी आहरीत करुन सदर प्रयोजनासाठी महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई या कार्यालयाकडे स्वतंत्रपणे उघडण्यात आलेल्या आयडीबीआय बँकेतील खाते क्र.०००४१०४०००३१४०९१ या खात्यामध्ये विहित कार्य पध्दतीने जमा करावा. सर्व देयकांची छाननी करुन त्यांचे प्रदान करण्याबाबतची कार्यवाही राज्य प्रकल्प संचालकामार्फत करण्यात येईल.

सदर अनुदान हे सशर्त अनुदान असून या अनुदानाच्या अटी व शर्ती सदर शासन निर्णयात नमूद केल्या आहेत.

६. प्रस्तावित कामासाठी उपलब्ध करुन देण्यात येणाऱ्या निधीची सक्षम प्राधिकाऱ्यांच्या स्वाक्षरीची उपयोगिता प्रमाणपत्रे सादर करण्याची जबाबदारी राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई यांची राहील.

७. राज्य शासनामार्फत वेळोवेळी वित्त विषयक निर्गमित करण्यात आलेले विविध आदेश/नियम/शासन निर्णय वित्तीय नियमावली यांची अंमलबजावणी करुन उपरोक्त निधी

आवश्यकतेनुसार मान्य निकषानुसार खर्च करण्यात यावा. संदर्भ क्र.०१ येथील शासन निर्णयामधील अटी व शर्तीचे काटेकोर पालन करण्याची दक्षता घेण्यात यावी.

८. संदर्भ क्र.४ येथील वित्त विभागाच्या परिपत्रकानुसार सदर लेखाशिर्षाखाली वितरीत करण्यात येणारा निधी दि.३१.०३.२०२५ पूर्वी खर्ची पडेल याची राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई यांनी दक्षता घ्यावी.

९. सदर शासन निर्णय नियोजन विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.२६८/१४७१, दि.२८.०३.२०२५ व वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.५२५/व्यय-५, दि.२९.०३.२०२५ अन्वये प्राप्त झालेल्या त्या विभागांच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

१०. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०३३११८११२५४७२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

TUSHAR VASANT MAHAJAN

Digitally signed by TUSHAR VASANT MAHAJAN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORT DEPARTMENT, 2.5.4.20=19c6c23f510a80926e9b7ee5db235979452f3f9e8918118634069a6cc7a22b9f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=1A39CEF3C157B9EE6A2ABE5779ACF233682613F7B9C335D6BF4877267695CECA, cn=TUSHAR VASANT MAHAJAN
Date: 2025.03.31 18:12:34 +05'30'

**( तुषार महाजन )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१. आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे
२. राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई,
३. शिक्षण संचालक (प्राथमिक), शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे,
४. शिक्षण संचालक (माध्यमिक/उच्च-माध्यमिक), शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र, राज्य, पुणे,
५. शिक्षण संचालक (योजना), शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे,
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१-मुंबई/महाराष्ट्र-२, नागपूर,
७. महालेखापाल (लेखा), महाराष्ट्र-१-मुंबई/महाराष्ट्र-२, नागपूर,
८. विभागीय शिक्षण उपसंचालक, (छत्रपती संभाजीनगर/लातूर)
९. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई,
१०. सर्व जिल्हा कोषागारे,
११. वरिष्ठ कोषागार अधिकारी, पुणे/नागपूर,
१२. वित्त विभाग (व्यय-५/अर्थ-८) मंत्रालय, मुंबई,
१३. नियोजन विभाग (का.१४७१), मंत्रालय, मुंबई,
१४. कार्यासन (अर्थसंकल्प),शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई यांना आवश्यक त्या कार्यवाहीसाठी.
१५. निवड नस्ती (कार्यासन-एसडी-६).